**राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना**
**प्रति क्विंटल रुपये १००/- अनुदान देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपस-२०१६/प्र.क्र.१२७/२४ स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- १५ एप्रिल, २०१७

**प्रस्तावना:-**

सन २०१५-१६ या वर्षात राज्यात कांद्याच्या उत्पादनात मोठ्या प्रमाणात वाढ झाल्यामुळे कांद्याच्या दरात घसरण झालेली आहे. त्यामुळे राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना आर्थिक मदत देण्याच्या दृष्टीने माहे जुलै, २०१६ व ऑगस्ट,२०१६ या महिन्यामध्ये राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समितीमध्ये कांदा विक्री केलेल्या शेतकऱ्यांना अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समितीमध्ये माहे जुलै, २०१६ व ऑगस्ट,२०१६ या महिन्यामध्ये कांदा विक्री केलेल्या शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये १००/- व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान मंजूर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

ही योजना राबविण्यासाठी खालीलप्रमाणे अटी व शर्ती निश्चित करण्यात येत आहेत :-

I. कांदा उत्पादक शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये १००/- व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान मंजूर करण्यात येईल.

II. ही योजना ज्या शेतकऱ्यांनी १ जुलै, २०१६ ते ३१ ऑगस्ट, २०१६ या कालावधीत बाजार समितीमध्ये कांदा विक्री केली आहे त्यांचेसाठी लागू राहील.

III. मुंबई कृषी उत्पन्न बाजार समिती, मुंबई वगळता राज्यातील सर्व बाजार समित्यांसाठी ही योजना राबविण्यात यावी.

IV. कांदा उत्पादक शेतकऱ्यांनी या योजनेखाली अनुदान मिळण्यासाठी कांदा विक्री पट्टीसह, ७/१२ चा उतारा, आपले बँक बचत खाते क्रमांक इ. सह साध्या कागदावर ज्या बाजार समितीकडे कांद्याची विक्री केलेली आहे तेथे अर्ज करावा.

V. परराज्यातून आवक झालेल्या व व्यापाऱ्यांच्या कांद्यास ही योजना लागू राहणार नाही.

VI. शेतकऱ्यांना भाव फरकाचे अनुदान प्राप्त करुन देण्याचे प्रस्ताव हे संबंधीत बाजार समितीने तयार करावेत. प्रस्ताव तयार करण्याची संपूर्ण जबाबदारी बाजार समितीची राहील. सदरचे प्रस्ताव तालुका सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था यांनी तपासून ते जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था यांचेकडे सादर करावेत. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांनी योग्य व पात्र प्रस्तावांना मंजूरी दिल्यानंतर ती यादी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावी. पणन संचालनालयामार्फत संबंधीत जिल्हा उपनिबंधकांना निधी वितरीत करण्यात येईल.

VII. या योजनेची योग्य पध्दतीने अंमलबजावणी करण्यासाठी संबंधीत बाजार समितीचे सचिव, तालुका सहाय्यक/उपनिबंधक, सहकारी संस्था व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था हे या योजनेचे नियंत्रक म्हणून कामकाज पाहतील व त्यासाठी ते जबाबदार राहतील. त्याचप्रमाणे प्रत्यक्ष उत्पादन व झालेली आवक यांची शहानिशा करण्यासाठी समित्या नियुक्त करण्यात याव्यात.

VIII. नाशिक जिल्ह्यातील ५०२ प्रकरणात ( ७/१२ उतारा वडिलांच्या नावे व विक्री पट्टी मुलाच्या व अन्य कुटुंबियाच्या नावे आहे व ७/१२ उताऱ्यावर पीक पाहणीची नोंद आहे) वडील व मुलगा वा अन्य कुटुंबिय यांनी सहमतीने उपरोक्त नमूद VII मध्ये नमूद समितीकडे शपथपत्र सादर केल्यानंतर ७/१२उतारा ज्यांच्या नावे असेल त्यांच्या बँक बचत खात्यामध्ये अनुदान जमा केले जाईल.

३. या योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या सर्व प्रस्तावांची छाननी करुन जिल्हानिहाय पात्र लाभार्थ्यांची यादी तयार करण्याची कार्यवाही पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्वरीत करावी. योजनेसाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१५१३३७४२६१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Valvi Kalu Gonya

Digitally signed by Valvi Kalu Gonya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op,Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, cn=Valvi Kalu Gonya
Date: 2017.04.15 13:41:02 +05'30'

(का. गो. वळवी)
उपसचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
४) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
५) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
६) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
८) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
९) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१०) अध्यक्ष, कृषी उत्पन्न बाजार समिती(सर्व)
११) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१४) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
१५) कार्यासन अधिकारी, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.